**उद्योग संचालनालयाच्या अधिनस्त मैत्री कक्षाच्या आस्थापनेवरील उप निबंधक या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन आदेश क्र : आयपीए-२१२४/प्र.क्र.१२८/का.१,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : २९ एप्रिल, २०२५

## शासन आदेश

विधि व न्याय विभागाच्या अधिनस्त निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील उप निबंधक, गट-ब (राजपत्रित) या पदावर कार्यरत असणाऱ्या खालील अधिकाऱ्यांची त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या ठिकाणी तात्पुरत्या स्वरुपात प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव व सध्याच्या पदस्थापनेचे पद | प्रतिनियुक्तीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|
| १ | श्रीमती धनश्री दत्तात्रय जाधव,<br>उप निबंधक, भागीदारी संस्था, मुंबई | उप निबंधक,<br>मैत्री कक्ष, उद्योग संचालनालय, मुंबई |

२. श्रीमती जाधव, उप निबंधक यांना उपरोक्त प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्तरावर कार्यमुक्त करण्यात येईल.

३. श्रीमती जाधव यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत प्रतिनियुक्ती भत्ता देय असणार नाही. श्रीमती जाधव यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे या काळातील प्रदाने) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दिनांक १७.१२.२०१६ मधील विहित अटी व शर्ती लागू राहतील.

४. श्रीमती जाधव यांच्या इतर सर्व प्रशासकीय व कार्यालयीन बाबी विधी व न्याय विभाग व निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत हाताळण्यात येतील.

५. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई या कार्यालयाने त्यांच्या प्रतिनियुक्तीबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०४२९१६२३२९४४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2025.04.29 16:24:25 +05'30'

**(मनिषा अ. कदम)**
**सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
३. विकास आयुक्त तथा उद्योग संचालक, नवीन प्रशासन इमारत, पहिला मजला, मंत्रालय, मुंबई ३२,
४. मैत्री कक्ष, महाराष्ट्र राज्य, लघु उद्योग विकास महामंडळ (MSSIDC), कृपानिधी, ९ वालचंद हिराचंद मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ००१,
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई,
६. श्रीमती धनश्री दत्तात्रय जाधव, उप निबंधक, भागीदारी संस्था, मुंबई,
७. निवड नस्ती/ वैयक्तिक नस्ती.